वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी या विद्यापीठास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) अंतर्गत <u>अनुदान वितरीत करणेबाबत (अनिवार्य)...</u>

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मकृवि-१२२३/प्र. क्र.११०/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च २०२४

**संदर्भ :-** १)वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ व दि.०५.०२.२०२४
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि. २६.०६.२०२४ व दि.२६.०९.२०२४.
३)नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी यांचे पत्र क्र.सिएफबी/२१२ व २१३/२४. दि.१९.०१.२०२४.

<u>प्रस्तावना:-</u>

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वित्त विभाग, शासन परिपत्रक दि. १२.०४.२०२३ नुसार वित्तीय वर्ष सन २०२३-२४ या प्रथम नऊमाहीकरीता आवश्यक असणाऱ्ा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीय निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत २०:२०:३० या प्रमाणात वितरीत करण्यास मान्यता प्रदान केली होती. त्यानुसार वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी या विद्यापीठास अनिवार्य खर्चाच्या मागणी क्र. डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण या मुख्य लेखाशीर्षाखालील ०१,पीकसंवर्धन (२४१५ ००५२) व ०३, पशुसंवर्धन (२४१५ ०२०३) या लेखाशिर्षातंर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता मंजूर वार्षिक तरतूदीच्या ३० टक्के निधी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांनी उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये परभणी कृषि विद्यापीठाकरीता अनिवार्य योजनांसाठी ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून निधी वितरीत करण्याबाबत निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केलेला आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी करीता २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीकसंवर्धन (२४१५ ००५२) व ०३-पशुसंवर्धन (२४१५ ०२०३) (अनिवार्य ) ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीच्या

४० टक्केच्या मर्यादेत खालीलप्रमाणे एकूण रु.३०३.१० लाख (अक्षरी रु.तीन कोटी, तीन लाख, दहा हजार) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशिल पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ.क्र. | अनिवार्य योजनेचे नाव | लेखाशीर्ष व उद्दीष्ट | अर्थसंकल्पीय तरतूद (सन २०२३-२४) | सुधारित अंदाज (सन २०२३-२४) | सन २०२३-२४ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १) | मागणी क्र.डी-३, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०४) वसंतराव नाईक कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान | ०१, पीकसंवर्धन (२४१५ ००५२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) | ७५०.०२ | ५२५.०१ | ३००.०० |
| २) | | ०३, पशुसंवर्धन (२४१५ ०२०३) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) | ७.७५ | ५.४३ | ३.१० |
| ३) | **एकूण** | | **७५७.७७** | **५३०.४४** | **३०३.१०** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१. वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ व दि.०५.०२.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२. कृषि विद्यापीठांनी योजना/योजनेतर आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत अनिवार्य योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच खर्च करावा.

३. वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४. ज्या योजनांतर्गत/योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६. कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच, महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७. विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम, १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम, १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता, १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. याप्रित्यर्थचा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सहायक लेखाधिकारी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक दि.१२.०४.२०२३ व दि.०५.०२.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.५५/२०२४/व्यय-१, दि.१४.०२.२०२४ नुसार दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१११०५०४२८१०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.03.11 11:01:15 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
२.कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
३.उपविभागीय कृषि अधिकारी,परभणी ,जि. परभणी.
४.महालेखापाल, महाराष्ट्र १/२(लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५.जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी/उपकोषागार अधिकारी, परभणी.
६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
८.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
९.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०.अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्यासन ६अे /अे, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई -०३२
११.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.